**मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांच्याकरिता Innova Crysta VXMT 7 STR Diesel MT या मॉडेलचे नवीन वाहन खरेदीस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.०६/नोंदणी शाखा,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक: ९ मे, २०२५**

संदर्भ:- १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक वाहन-२००८/ (५९/०८)/नोंदणी शाखा, दिनांक- ७ डिसेंबर, २०१२.

२) पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, शासन निर्णय क्र. मइवाधो-२०२१/प्र.क्र. २५/तां.क.४, दिनांक २३ जुलै, २०२१.

३) वित्त विभाग शासन निर्णय क्र.वाहन२०२१/ प्र.क्र.२२/२०२१/विनियम, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२.

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.वाहन२०२४/ प्र.क्र.११/विनियम, दिनांक ०२ फेब्रुवारी, २०२४.

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन दि.७ डिसेंबर, २०१२ च्या शासन निर्णयान्वये शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या खालील नमूद ५ पदांना ५ वाहने व १ स्टाफ कार अनुज्ञेय करण्यास राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिलेली आहे.

| अ.क्र. | पदनाम | एकूण वाहने |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री (शालेय शिक्षण) | १ |
| २ | मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) | १ |
| ३ | मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) | १ |
| ४ | मा. राज्यमंत्री (क्रीडा) | १ |
| ५ | मा. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) | १ |
| ६ | स्टाफ कार (कार्यालयीन वापराकरिता) | १ |

सद्यस्थितीत, मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांना कार्यालयीन वापराकरिता शासकीय वाहन उपलब्ध करून देणे आवश्यक असल्याने, त्यांचेकरीता नवीन वाहन खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन आदेश :-**

मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण), यांच्या कार्यालयीन वापराकरिता रुपये रु.२५,६८,३९३/- (अक्षरी रुपये पंचविस लक्ष अडुसष्ट हजार तीनशे त्र्यान्नव फक्त) इतक्या किंमतीचे (वाहनाची किंमत, सेस, वस्तू व सेवा कर, टेंपररी रजिस्ट्रेशन चार्जेस, सहाय्यभूत साहित्य (Accessories) " Innova Crysta VX MT 7 STR Diesel MT " हे नवीन वाहन "मे मधुबन मोटर्स. प्रा.लि. मुंबई " या कंपनीकडून खरेदी करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. उपरोक्त वाहनाच्या खरेदीसाठी होणारा खर्च “मागणी क्र. ई-३, २२५१,सचिवालय सामाजिक सेवा, ०९० सचिवालय, (०१) सचिवालय, (०१)(०१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अनिवार्य) २२५१००२४, १३ कार्यालयीन खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. विभागाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी वाहन खरेदीची उपरोक्त रक्कम रु.२५,६८,३९३/- (अक्षरी रुपये पंचविस लक्ष अडुसष्ट हजार तीनशे त्र्यान्नव फक्त) " मे.मधुबन मोटर्स .प्रा.लि. मुंबई " यांना ऑनलाईन पेमेंट सिस्टीमव्दारे/विहित मार्गाने अदा करावी.

५. हे आदेश, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२ दिनांक १७/४/२०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला उपविभाग दोन, अनुक्रमांक १९ ब, नियम ६९ नुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन आदेश, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४४/२०२५/विनियम, दिनांक २७.०१.२०२५ व वित्त विभाग अनौपचारिक सं.क्र.७३/व्यय-५, दिनांक २२.०१.२०२५ तसेच पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १३०/तां.क.४, दिनांक ०३.०२.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार व राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५०९१५०७२९०८७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHINDE DATTATRAY C

Digitally signed by SHINDE DATTATRAY C
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=c1a6eca3de0649dd85e78e2f9d0680fd23c23c7952a7d5dc91d34437d85a2ae4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D64E9D959B0D379CE4141FED53CDE1EF8DF885C3CE6552805FBBAE4AF52C9EA8, cn=SHINDE DATTATRAY C
Date: 2025.05.09 15:08:36 +05'30'

**(द.छ.शिंदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग), मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक
३. उपसचिव, वित्त विभाग (व्यय-५/विनियम), मंत्रालय, मुंबई-३२
४. कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई
६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. Madhuban Motors Pvt. Ltd., Meher Abad Building, Bhulabhai Desai Road, Breach Candy, Mumbai-४०० ०२६.
९. निवडनस्ती (नोंदणी शाखा)